महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा), गट-ब
मधील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय बदल्या
उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदे

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः ईएसटी ३९१७/प्र.क्र.२४ /प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ७ जुलै, २०१७

<u>वाचा</u>:- शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी-३९१७/ प्र.क्र.४६/ प्रशा-२, दिनांक १७.३.२०१७.

**-शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दि. १ जुलै, २००६ पासून अंमलात आला आहे. सदर अधिनियमातील कलम ६ नुसार बदली करण्याबाबत सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहेत. तसेच या कलमाच्या परंतुक २ नुसार बदली करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याला, सर्वसाधारण व विशेष आदेशाद्वारे या कलमाखाली त्याचे अधिकार त्यांच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्याकडे सोपविता येतील अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब मधील उपशिक्षणाधिकारी व तत्सम संवर्गातील अध्यापकीय पदे वगळण्यात आल्यामुळे ज्या अधिकाऱ्यांनी प्रशासन शाखेच्या पदाचा विकल्प दिलेला आहे अशा अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | **नाव** | **सध्याचे कार्यरत ठिकाण** | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | **२** | **३** | ४ |
| १ | श्री.सु.ज. कुऱ्हाडे | प्राचार्य, शासकीय अध्यापक विद्यालय, उर्दू मुलांचे, पुणे | समाज शिक्षण अधिकारी, अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण संचालनालय, म.रा.पुणे |
| २ | श्रीमती एस.एस. सावंत | मुख्याध्यापक, राजाराम हायस्कूल (मेन्स), कोल्हापूर | गटशिक्षणाधिकारी, पं.स.पन्हाळा, जि.कोल्हापूर |
| ३ | श्रीमती मिनल भेंडे | मुख्याध्यापक, जि.प.प्रशाला (कन्या) जि.अकोला | गटशिक्षणाधिकारी, पं.स. बार्शीटाकळी, जि.अकोला |
| ४ | श्रीमती एम.बी. वाव्हळ | मुल्यमापन अधिकारी, विद्या प्राधिकरण, म.रा. पुणे | गटशिक्षणाधिकारी, पं.स.मावळ, जि.पुणे |
| ५ | श्री.श.ए.चव्हाण | अधिव्याख्याता, विद्या प्राधिकरण, पुणे | गटशिक्षणाधिकारी, पं.स.देवगड, जि.सिंधुदुर्ग |
| ६ | श्री.एम.के.थिटे | अधिव्याख्याता, म.रा. दृकश्रवण शि.सं.पुणे | गटशिक्षणाधिकारी, पं.स.वैभववाडी, जि.सिंधुदुर्ग |
| ७ | श्रीमती संगिता घोडेकर | अधिव्याख्याता, म.रा. दृकश्रवण शि.सं.पुणे | विशेष कार्यक्रम अधिकारी, विद्या प्राधिकरण, पुणे |
| ८ | श्रीमती प्रि.दौ. पाटील | अधिव्याख्याता, राज्य आंग्लभाषा अध्यापन संस्था, औरंगाबाद | गटशिक्षणाधिकारी, पं.स. घनसावंगी, जि.जालना |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ | श्री. बी. आर. रोकडे | मूल्यमापन अधिकारी, म. रा. परीक्षा परिषद, पुणे | उपशिक्षणाधिकारी (माध्य.) जि. नंदुरबार |
| १० | श्री. सु. बा. पाखरे | मूल्यमापन अधिकारी, म. रा. परीक्षा परिषद, पुणे | उपशिक्षणाधिकारी (माध्य.) जि. पुणे |
| ११ | श्री. मा. नि. पाटील | शास्त्र सल्लागार, शिक्षण उपसंचालक कार्या., नाशिक | गटशिक्षणाधिकारी, पं.स.भिंवडी, जि.ठाणे |
| १२ | श्रीमती व्ही.ए. टाळकुटे | सहायक व्यवसाय मार्गदर्शन अधिकारी,व्य.मा.व नि.सं.पुणे | गटशिक्षणाधिकारी, पं.स.जव्हार, जि.पालघर |

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दि.३० ऑगस्ट१९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. आयुक्त (शिक्षण), पुणे यांनी संदर्भाधीन आदेशात नमूद केल्याप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर आदेश बदली अधिनियम २००५ मध्ये नमूद कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०७१८२६५५९७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2017.07.07 18:29:14 +05'30'

**(र. प्र. आटे)**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, शिक्षण,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३. सर्व संचालक
४. सर्व विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ
५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
६. संबंधित शिक्षणाधिकारी (प्राथ./ माध्य.)
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी/ अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. संबंधित अधिकारी ( शिक्षण आयुक्तालयामार्फत )

**प्रत माहितीस्तव,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. निवडनस्ती, प्रशा-२